प्रशासकीय मान्यता
फलटण, जिल्हा सातारा येथे जिल्हा न्यायाधीश आणि अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांचेकरिता निवासस्थानांचे बांधकाम करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
शासन निर्णय क्र. सीआरक्यू-१२२२/प्र.क्र.५३/का-१३,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २६ एप्रिल, २०२२

पहा :-

मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू) ६०५४/१९६५ (९)/५७३/७५७८, दिनांक ३ मार्च, २०२२ चे पत्र.

प्रस्तावना:-

फलटण, जिल्हा सातारा येथे जिल्हा न्यायाधीश आणि अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांचेकरिता निवासस्थानांचे बांधकाम करण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर केला आहे. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

**फलटण, जिल्हा सातारा येथे जिल्हा न्यायाधीश आणि अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांचेकरिता निवासस्थानांचे बांधकाम करण्याकरिता रु.१,२२,५१,२८५/- (रुपये एक कोटी बावीस लक्ष एक्कावन्न हजार दोनशे पंच्याऐंशी फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | तपशिल | प्रशासकीय मान्यता रुपयात |
|---|---|---|
| **अ)** | **आवश्यक बाबी** | |
| १ | तळ मजला | ४८,६२,५२०/- |
| २ | रेन वॉटर हार्वेस्टिंग | ६०,०००/- |
| ३ | फर्निचर | ६,५४,५५०/- |
| ४ | पाणी पुरवठा आणि मलनि:सारण | २,४३,१२६/- |
| ५ | अंतर्गत विद्युतीकरण | २,४३,१२६/- |
| ६ | बाह्य विद्युतीकरण | २,९१,७५१/- |
| ७ | अग्नीशमन यंत्रणा | ५०,०००/- |
| **ब)** | **संकिर्ण बाबी** | |
| ८ | कंपाऊंड वॉल | ७,८७,२००/- |
| ९ | अंतर्गत रस्ते | ७,५०,०००/- |
| १० | भूविकास | १,००,०००/- |
| **क)** | **वैकल्पीक बाबी** | |
| ११ | पाण्याची टाकी आणि रेन वॉटर हार्वेस्टिंग | ५०,०००/- |
| १२ | वॉटर स्टोरेज आणि बोअरवेल | २,००,०००/- |
| १३ | एबी रुम आणि एरिया लाईटिंग पंप | १,००,०००/- |
| १४ | सीसीटीव्ही | १,५०,०००/- |

| | | |
|---|---|---|
| १५ | एचटीओएच लाईन, ट्रान्सफॉर्मर एमएसईडीसीएल जोडणी | १०,००,०००/- |
| १६ | रस्त्यावचे लाईट | ३,००,०००/- |
| **ड)** | **इतर तरतूदी** | |
| १७ | आकस्मिक खर्च (४%) | १,९४,५०१/- |
| १८ | भाववाढ (बांधकामाच्या १०%) | ९,८४,२२७/- |
| १९ | वस्तू व सेवा कर (प्रकल्प खर्चाच्या १२%) | ११,८१,०७३/- |
| २० | कामगार वीमा (प्रकल्प खर्चाच्या ०.५%) | ४९,२११/- |
| | **एकूण प्रकल्प किंमत (अ+ब+क+ड)** | **१,२२,५१,२८५/-** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) सदरचे अंदाजपत्रक हे नमुना अंदाजपत्रक असल्याने या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी, फलटण यांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

३) नियोजित जागा उपभोक्त विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

४) सदर कामाची निविदा काढताना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

५) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३ / प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

८) सदर कामाकरिता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, या दृष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

९) अंदाजपत्रकीय कामात बदल करु नये.

१०) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंता यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नयेत.

११) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास, याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहिहत मुदतीत व पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधीत अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी ""मागणी क्र. एच-७, ४२१६, गृहनिर्माणावरील भांडवली खर्च -०१ शासकीय निवासी इमारती- ७००, इतर गृहनिर्माण, (०१) न्यायदान-केंद्रपुरस्कृत योजना, राज्यहिस्सा (०१) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६ ०२९१) व केंद्र हिस्सा (०३) (०४) मोठी बांधकामे- ५३ मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०५२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र**, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.६२/२०२२/इमा-२, दिनांक ३० मार्च, २०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच, सार्वजनिक बांधकाम विभाग, परिपत्रक, क्र.संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये मा. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार तसेच, नियोजन विभाग, परिपत्रक, क्र.ससमा-२०१०/ प्र.क्र.४८/भाग-१/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०४२६१५१०४६५५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.04.26 15:12:22 +05'30'

**( नितिन वि. जिवने )**
विधि सल्लागार-नि-सह सचिव,
महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४) मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,
५) मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, सातारा.
६) मा.प्रबंधक (निरीक्षणे-२) अपिल शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर,
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा.
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११) उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, फलटन, जिल्हा सातारा.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.

१३) सार्वजनिक बांधकाम विभाग (ईमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

१४) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१५) नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१६) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.

१७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१८) कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१९) निवड नस्ती/संग्रहार्थ.